**महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेअंतर्गत योजना राबविण्यासाठी संस्थेस निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्रशासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. अमृत २०२२/प्र.क्र.०१/संस्था**
मादामकामारोड, हुतात्माराजगुरुचौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३० मार्च, २०२३

<u>वाचा</u>-१. शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र. प्रसंस्था-२०१९/प्र.क्र. १००/ महामंडळे, दि. २२.०८.२०१९
२.अमृत संस्थेच्या कार्यकारी समितीच्या ( बोर्ड ऑफ गव्हर्नस) दिनांक २७.२.२०२३ च्या बैठकीचे इतिवृत्त, दि.५.३.२०२३
३. व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांचे दिनांक १३.३.२०२३ चे पत्र
४. शासन निर्णय समक्रमांकीत दि. १४.०३.२०२३

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यातील खुल्या प्रवर्गातील आर्थिक दृष्टया दुर्बल घटकातींल विदयार्थी, युवक, युवती इत्यादीचा विकास घडविण्याकरीता Academy of Maharashtra, Research, Upliftment and Training (AMRUT) संस्था स्थापन करण्यास संदर्भ क्र. १ येथे नमूद दिनांक २२.८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर संस्थेची नोंदणी रजिस्ट्रेशन ॲक्ट ( Society Registration Act १८६०) आणि सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५०, ( सन १९५० चा मुंबई अधिनियमक्र.२९ ) अंतर्गत करण्यात आली आहे व यासाठी तयार करण्यात आलेल्या मेमोरँडम ऑफ असोशिएशन अँड रुल्स (Memorandum of Association and Rules) यांना शासन निर्णय दि.२८/०६/२०२१ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे. अमृत संस्थेच्या कार्यकारी समितीने (बोर्ड ऑफ गव्हर्नस) दिनांक २७.२.२०२३ च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांना नाविण्यपूर्ण योजनांचे नियोजन व अंमलबजावणीसाठी प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांनी संदर्भ क्र.३ येथे नमूद दिनांक १३.३.२०२३ च्या पत्रान्वये खुल्या प्रवर्गातील आर्थिक दृष्टया दुर्बल घटकातींल विदयार्थी, युवक, युवती इत्यादीचा विकास घडविण्यासाठी योजना राबविण्याकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूद वितरीत करण्याची विनंती केली. त्यानुसार संदर्भ क्र. ४ येथे नमूद दि.१४.०३.२०२३च्या शासन निर्णयान्वये अमृत संस्थेस कार्यालयीन खर्च व संस्था स्तरावर प्रस्तावित नवीन योजना राबविण्यास

प्रशासकीय मान्यता देवून अर्थसंकल्पीय सुधारीत तरतूदीतून रु.२३.५२ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरितनिधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत) या संस्थेचे कामकाज सुरु करणे तसेच संस्थास्तरावर योजनांचे नियोजन व अंमलबजावणी करण्याकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूद रु.२४.०० कोटीपैकी रु.२३.५२ कोटी इतका निधी संदर्भ क्र. ४ येथे नमूद शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे.

२. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मागणी क्र. झेडजी २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (०१) (१०), महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत)(कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२२५एफ५३२ )या लेखाशीर्षाखालील उपलब्ध तरतूदीतून उर्वरीत रु. ४८.०० लाख इतका निधी (रुपये अठ्ठेचाळीस लाख फक्त )वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (संस्था ) यांना व कक्ष अधिकारी (रोखशाखा )यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्तीय नियमावली व महाराष्ट्र अर्थ नियमावलीपुस्तिकानुसार वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) वेळोवेळी शासनास सादर करण्याचीजबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक,अमृत यांची राहील.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौ.सं.क्र. ७२/२०२३, दि. २४/३/२०२३ व अनौ.सं.क्र. ३८४/२३/व्यय-१४, दि. २९/३/२०२३ अन्वये वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११२५४३०७९३४ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c550dd52f3943153bdbd47e381bb9818c91359bd0588e1b35b3c0c18ad7bf938, pseudonym=B6DDBEDBC1E63E4332429DB625320D8F56899C89, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2023.03.31 13:00:26 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहितीवआवश्यककार्यवाहीसाठीअग्रेषित:-**

१) मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
४) मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

६) सर्व मंत्रालयीन विभागांचे अमुस/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
८) व्यवस्थापकीय संचालक, अमृत, पुणे
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ /२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
१०) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
११) कक्ष अधिकारी(अर्थसंकल्प)/ (रोखशाखा),इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती.